मा. राज्यपाल महोदयांच्या अभिभाषणाच्या प्रतींचे मा. विधानमंडळ सदस्य व इतर मान्यवरांना वाटप करण्यासाठी फोल्डर्सची खरेदी करण्यास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**संसदीय कार्य विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः राअभा ६०१८/प्र.क्र.९१/तीन**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२

दिनांक: २२ जानेवारी, २०१९

वाचा :-

१. शासन निर्णय, संसदीय कार्य विभाग, क्रमांक विविअ-२०११ / प्र.क्र.४०/ दोन, दिनांक ३० जानेवारी २०१२

२. शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्रमांक-भांखस-२०१४/प्र.क्र.८२ भाग३/ उद्योग-४, दिनांक १ डिसेंबर २०१६

३. शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, संकीर्ण-२०१६/प्र.क्र.२१५/उद्योग-४, दिनांक २४ ऑगस्ट २०१७

४. कार्यालयीन आदेश, संसदीय कार्य विभाग, क्रमांक राअभा ६०१८/ प्र.क्र.२/तीन दिनांक ३ ऑगस्ट २०१८

प्रस्तावना :-

महाराष्ट्र विधानमंडळाच्या अर्थसंकल्पीय अधिवेशनाच्या प्रारंभी मा.राज्यपाल महोदय विधानमंडळाच्या दोन्ही सभागृहांच्या सदस्यांसमोर अभिभाषण करतात. सदर अभिभाषणाच्या प्रती एक्झिक्युटिव्ह फोल्डर्समधून सन्माननीय विधानमंडळ सदस्य व इतर मान्यवरांना पुरविण्याची प्रथा आहे. उक्त फोल्डर्स या विभागाकडून पुरविले जातात. मान्यवरांसाठी एकूण ४६० फोल्डर्स खरेदी करण्याचा प्रस्ताव या विभागाच्या विचाराधीन आहे.

शासनाच्या उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या संदर्भाधीन अनुक्रमांक ३ येथील शासन निर्णयान्वये गव्हर्नमेंट ई-मार्केटप्लेस या पोर्टलवर वस्तू व सेवा यांची खरेदी करणे विभागांना बंधनकारक करण्यात आले आहे. त्यानुसार आवश्यक फोल्डर्सची खरेदी गव्हर्नमेंट ई-मार्केटप्लेस पोर्टलवरुन करण्याची कार्यवाही सुरु करण्यात आली होती. तथापि, फोल्डर्सची खरेदी उक्त पोर्टलवरुन सुरु करण्याच्या प्रकियेमध्ये काही वास्तविक अडचणी उद्भवल्या. ज्याप्रमाणे की, सदर फोल्डर्स हे विधानमंडळाचे मा.पीठासन अधिकारी, मा.विधानमंडळ सदस्य व इतर मान्यवरांना देण्यात येत असल्यामुळे त्यांच्या दर्जाबाबत काळजी घेणे अनिवार्य ठरते. उक्त पोर्टलवरुन खरेदी करणे बंधनकारक करण्यापूर्वी सदर खरेदी ही दरपत्रकावरील पुरवठादारांकडून करण्यात येत होती.

त्यावेळेस पुरवठादारांनी पुरविलेल्या फोल्डर्सचा दर्जा, रुप, आकारमान इत्यादींची प्रत्यक्षपणे पाहणी तपासणी करणे शक्य होत होते. सदर सुविधा उक्त पोर्टलवरुन खरेदी करताना उपलब्ध नाही. फोल्डर्स हे मान्यवरांना द्यावयाचे असल्याने, त्याची अंतिम निवड ही मा.मंत्री, संसदीय कार्य यांच्याकडून फोल्डर्सची प्रत्यक्ष पाहणी करुन केली जाते. गव्हर्नमेंट ई-मार्केटप्लेस मार्फत खरेदी प्रक्रियेत फोल्डर्स प्रत्यक्ष पाहण्याची सुविधा उपलब्ध नाही. या फोल्डर्समधून मा. राज्यपालांच्या अभिभाषणाच्या प्रती वितरीत करण्यात येत असल्यामुळे तपासणी न करता केवळ गर्व्हेनमेंट-ई-मार्केटप्लेस पोर्टलवर दिसणाऱ्या फोल्डर्सच्या प्रतिमेच्या आधारे खरेदी केल्यास आणि फोल्डर्सचा दर्जा अपेक्षेनुसार नसल्यास मान्यवरांकडून टीका व नाराजी निर्माण होण्याची शक्यता नाकारता येत नाही. तसेच सदर पोर्टलवरुन नमुना फोल्डर (Sample copy) उपलब्ध करुन घेण्याची सुविधा नसल्याने त्याचा दर्जा तपासण्याची संधी उपलब्ध होत नाही.

उपरोक्त नमूद केलेल्या पार्श्वभूमीवर उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या संदर्भाधिन अनुक्रमांक २ येथील दिनांक १ डिसेंबर २०१६ च्या शासन निर्णयांतर्गत तरतुदीनुसार (परिच्छेद ३.२.३) दरपत्रकाच्या आधारे खरेदी करण्यास 'एक विशेष बाब' म्हणून मान्यता देण्याचा प्रस्ताव उद्योग, उर्जा व कामगार विभागास पाठविण्यात आला असता त्या विभागाने, 'खरेदी धोरणात यामध्ये स्पष्ट तरतूदी आहेत, GeM वर वस्तु व सेवा उपलब्ध होत नसल्यास त्या विभागाने सर्व बाबींची खात्री करुन योग्य त्या कारणमीमांसेसह, समर्थनासह व आर्थिक किफायतशीरपणा पाहून योग्य तो निर्णय घ्यावा' असे अभिप्राय दिले आहेत.

**शासन निर्णय :-**

उपरोक्त पार्श्वभूमीवर उद्योग, उर्जा व कामगार विभागाने दिलेल्या अभिप्रायाच्या अनुषंगाने मा. राज्यपालांच्या अभिभाषणाकरीता करावयाच्या फोल्डर्सची खरेदी दरपत्रकाच्या आधारे करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. मात्र सदर खरेदी करताना दरपत्रकाच्या आधारे खुल्या बाजारातून किमान ३ इतक्या पुरवठादारांकडून दरपत्रके मागविण्यात यावीत, तुलनात्मकदृष्ट्या फोल्डर्सचा अपेक्षित दर्जा, किंमत (एल-१), पुरवठा करण्यास लागणारा कालावधी, इत्यादी बाबींचा विचार करुन फोल्डर्स खरेदी करण्याची दक्षता घेण्यात यावी या अटींच्या अधीन राहून प्रस्तुत मान्यता देण्यात आली आहे.

२. वर नमूद केलेल्या परिस्थितीत मा.राज्यपाल महोदयांच्या अभिभाषणाच्या प्रतींचे वाटप करण्यासाठी ४६० एक्झिक्युटिव्ह फोल्डर्सची खरेदी ही उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या संदर्भाधिन अनुक्रमांक २ येथील शासन निर्णयातंर्गत तरतूदीतील परिच्छेद क्रमांक ३.२.३ नुसार दरपत्रकाच्या आधारे करण्यास याद्वारे प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

३. सदर खर्च संसदीय कार्य विभागाच्या ' मागणी क्रमांक - पी - १, मुख्यलेखाशिर्ष २०५२ - सचिवालय - सर्वसाधारण सेवा, ०९० - सचिवालय, (००)(०१) संसदीय कार्य विभाग (अनिवार्य), संकेतांक (२०५२ ०२६८), १३, कार्यालयीन खर्च ' या लेखाशिर्षाखालील सन २०१८-१९ या आर्थिक वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. शासन निर्णय, संसदीय कार्य विभाग क्रमांक विविअ-२०११/ प्र.क्र.४०/दोन, दिनांक ३० जानेवारी, २०१२ अन्वये वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ च्या भाग पहिला, उपविभाग दोन खालील महाराष्ट्र आकस्मिक खर्च नियम, १९६५ अन्वये प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारातील अनुक्रमांक १ येथील नियम क्रमांक ७ मध्ये बदल करण्यात आला असून त्यानुसार उक्त फोल्डर्स खरेदी करण्याबाबतच्या रु.२,७५,०००/- इतक्या मर्यादेपर्यंतच्या खर्चास मंजूरी देण्याचे अधिकार सचिव, संसदीय कार्य विभाग यांना प्रदान करण्यात आले आहेत. प्रस्तुत मान्यता सदर अधिकारानुसार देण्यात येत आहे.

५. प्रस्तुत शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०१२२१७०८५५२७१५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sanjay Vasudeo Jadhav

Digitally signed by Sanjay Vasudeo Jadhav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Parliamentary Affairs, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=46b3ee3c307381324abb3d60d1affb2c15ed046cf0907da3bfbb5f1f0dcd3cfe, serialNumber=bbde2a625f76bd7c322ce4089756d41f788d1ab32918ef26fc2d1560fb85949c, cn=Sanjay Vasudeo Jadhav
Date: 2019.01.22 17:12:07 +05'30'

( सं.वा.जाधव )

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री (संसदीय कार्य), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा.राज्यमंत्री (जलसंपदा, जलसंधारण, संसदीय कार्ये) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

३. मा.राज्यमंत्री, (गृह, नगरविकास, सामान्य प्रशासन, विधि व न्याय,संसदीय कार्ये), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

४. अप्पर मुख्य सचिव, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, (उद्योग), मंत्रालय, मुंबई

५. सचिव (संसदीय कार्य) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.

६. महालेखापाल १/२, महाराष्ट्र राज्य , (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर

७. महालेखापाल१/२, महाराष्ट्र राज्य (लेखापरिक्षा)मुंबई / नागपूर

८. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई

९. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई

१०. कक्ष अधिकारी (सर्व कार्यासने), संसदीय कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई

११. निवडनस्ती.